**शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून राज्यात व्दितीय पाळीत सुरु असलेल्या व्यावसायिक अभियांत्रिकी व औषधनिर्माणशास्त्र पदविका अभ्यासक्रमांचे प्रथम पाळीत रुपांतर करण्यास अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन शासन मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. मान्यता-२०१८/(प्र.क्र.१४५/१८) तांशि-५**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २६ जून, २०१८.

**<u>संदर्भ</u> :** १) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक १०/एनजीपी/मान्यता/२०१८/५००, दिनांक २४.०५.२०१८.
२) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक १०/एनजीपी/मान्यता/२०१८/५६२, दिनांक ०८.०६.२०१८.

**प्रस्तावना :-**

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचेकडून शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून राज्यातील व्दितीय पाळीत सुरु असलेल्या व्यावसायिक अभियांत्रिकी व औषधनिर्माणशास्त्र पदविका अभ्यासक्रमांच्या संस्थेतील अभ्यासक्रम प्रथम पाळीत रुपांतरीत करणे तसेच प्रथम पाळीत रुपांतरीत करण्यात आलेले व्दितीय पाळीत सुरु असलेले व्यावसायीक अभियांत्रिकी व औषधनिर्माणशास्त्र पदविका अभ्यासक्रमांच्या प्रवेश क्षमतेत बदल करणेबाबत मान्यता देण्यासंदर्भात दिनांक १४.०५.२०१८ रोजीचे ई-मेल व्दारे प्राप्त यादी तसेच दिनांक १०.०४.२०१८ रोजीचे पत्र व आदेश या व्दारे तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राप्त झालेल्या माहितीचे अनुषंगाने संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय यांनी संदर्भीय पत्र क्रमांक १ व २ अन्वये शासनास प्रस्ताव सादर केलेला आहे. सोबत जोडलेल्या Annexture A मधील अ.क्र. १ ते ०७ संस्थांना त्यांच्या नावासमोर दर्शविल्याप्रमाणे व्दितीय पाळीत सुरु असलेले व्यावसायिक अभियांत्रिकी व औषधनिर्माणशास्त्र पदविका अभ्यासक्रम प्रथम पाळीत रुपांतरीत करणे तसेच प्रथम पाळीत रुपांतरीत करण्यात आलेले व्दितीय पाळीत सुरु असलेले व्यावसायीक अभियांत्रिकी व औषधनिर्माणशास्त्र पदविका अभ्यासक्रमांच्या Annexture A मधील अनुक्रमांक १ व ७ येथे नमुद संस्थांना त्यांच्या नावासमोर नमुद केल्याप्रमाणे प्रवेश क्षमतेत बदल करण्यास शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन सोबत जोडलेल्या Annexture A मध्ये नमूद अ.क्र. १ ते ०७ मधील व्दितीय पाळीत सुरु असलेले व्यावसायिक अभियांत्रिकी व औषधनिर्माणशास्त्र पदविका अभ्यासक्रम प्रथम पाळीत रुपांतरीत करण्यास तसेच प्रथम पाळीत रुपांतरीत करण्यात आलेले व्दितीय पाळीत सुरु असलेले व्यावसायीक अभियांत्रिकी व औषधनिर्माणशास्त्र पदविका अभ्यासक्रमांच्या Annexture A मधील अनुक्रमांक १ व ७ येथे नमुद संस्थांना त्यांच्या नावासमोर नमुद केल्याप्रमाणे प्रवेश क्षमतेत बदल करण्यास शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१. प्रस्तुत बाबतीत अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या तसेच दिनांक २१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील. सदर अभ्यासक्रमासाठी संस्थेची प्रवेश क्षमता विवरणपत्रातील त्यांच्या नावासमोर नमूद केल्याप्रमाणे मर्यादित राहील.

२. शासनाने विहित केलेल्या तसेच अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

३. सदर पदविका अभ्यासक्रमांसाठी संबंधित संस्थेने महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाची संलग्नता घेणे आवश्यक आहे.

४. पदविका औषधनिर्माणशास्त्र अभ्यासक्रमाच्या संस्थाप्रमुखांनी फार्मसी कौन्सील ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांची मान्यता घेणे बंधनकारक राहील. सदर मान्यतेअभावी भविष्यात काही न्यायालयीन प्रकरणे उदभवल्यास याप्रकरणी संबंधित संस्था पूर्णपणे जबाबदार राहतील. तसे हमीपत्र संबंधित संस्थाप्रमुखांनी संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडे सादर करावयाचे आहे.

५. संबंधित संस्थेने संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडे आवश्यक ते प्रक्रिया शुल्क (Processing Fee) व संयुक्त खात्यात संचित ठेव भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

६. महाराष्ट्र राज्यातील विनाअनुदानित खाजगी व्यावसायिक शैक्षणिक संस्थांमधील प्रवेशाचे व शुल्काचे विनियमन करण्यासाठी आणि त्याच्याशी संबंधित किंवा तदानुषंगिक बाबींसाठी

सन २०१५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक २८ व त्याच्याअनुषंगाने वेळोवेळी निर्गमित होणारे नियम तथा आदेश संबंधित संस्थांना लागु राहतील.

७. संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी नेमावे व शासन नियमाप्रमाणे वेतन व भत्ते कर्मचाऱ्यांना देण्यात यावे. तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इत्यादी बाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर दंडात्मक कारवाई करण्याबाबत अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेकडे शिफारस करण्यात येईल.

८. सदर संस्था, संचालक, तंत्रशिक्षण यांच्या नियंत्रणाखाली राहिल व संबंधित अभ्यासक्रमांच्या परीक्षा महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, वांद्रे, मुंबई यांच्याकडून घेतल्या जातील.

९. शिक्षण शुल्क नियामक प्राधिकरण यांनी विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्युशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ नुसार कारवाई करण्यात येईल.

१०. रॅगिंग संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

११. प्रथम पाळीसाठी अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली, महाराष्ट्र शासन व संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी विहित केलेल्या अटी/शर्ती यांची पुर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहिल.

१२. याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६२६१२३१४२४२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Raghunath Katkar

Digitally signed by Anil Raghunath Katkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3fec0b0f5c05dc9058175992109e62d3f5719b9dfb87a96579dc30c265d67ce, serialNumber=2356d82c73e8a0c7b6da68b6511197206b94720842cda576febebf84581fc52a, cn=Anil Raghunath Katkar
Date: 2018.06.26 12:42:40 +05'30'

**(अ.र.काटकर)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई

३. सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय, मुंबई /पुणे/नाशिक/औरंगाबाद/नागपूर/ अमरावती (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)

४. संबंधित विद्यापीठांचे कुलसचिव, (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)

५. सर्व संबंधित संस्था (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)

६. अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली - ११० ००१.

७. फार्मसी काऊन्सिल ऑफ इंडिया, कम्बाइन्ड काऊन्सिल्स् बिल्डिंग, कोटला रोड, एजवान-इ-गालिब मार्ग, नवी दिल्ली-११० ००२.

८. सहायक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण भाग), नवी दिल्ली.

९. विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डींग, २ रा मजला, चर्चगेट, मुंबई

१०.निवड नस्ती/तांशि-५.

शासन निर्णय क्र.मान्यता-2018/(प्र.क्र.145/18)तांशि-5, दिनांक 26 जून, 2018 सोबतचे

## Annexure A

**List of Diploma Courses Converted From Second Shift to First Shift, Approved by AICTE for A.Y. 2018-19**

| Sr No | Current Application Number | Institute Code | Permanent ID | Institute Name | Institute Address | District | Institution Type | Parent Organisation | Organisation Address | Minority Institute | Program | University/ Board | Level | Course Name | Shift | Full Time/ Part Time | Intake Approved for 2017-18 | Intake Approved for 2018-19 |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 1-3516281353 | 1136 | 1-12529971 | DR. RAJENDRA GODE COLLEGE OF PHARMACY, MALKAPUR | IBSS COLLEGE OF PHARMACY HANUMAN NAGAR MAKAPUR DISTRICT BULDANA | BULDHANA | Unaided - Private | INDIRA BAHUUDDESHIYA SHIKSHAN SANSTHA BULDANA | DR. GODE NURSING HOME CHIKHLI ROAD | N | PHARMACY | Maharashtra State Board of Technical Education, Mumbai | DIPLOMA | PHARMACY | 1st Shift | FULL TIME | 120 | 60 |
| 2 | 1-3515224539 | 3218 | 1-4790201 | ST. JOHN COLLEGE OF ENGINEERING AND MANAGEMENT | ST. JOHN TECHNICAL EDUCATION COMPLEX, VEVOOR, MANOR ROAD, PALGHAR (E), THANE DISTRICT | THANE | Unaided - Private | ALDEL EDUCATION TRUST | S/2, WEST VIEW AVENUE CO-OP. SOC. LTD., HOLY CROSS ROAD, I.C. COLONY, BORIVLI (WEST) | Y | ENGINEERING AND TECHNOLOGY | Maharashtra State Board of Technical Education, Mumbai | DIPLOMA | CIVIL ENGINEERING | 1st Shift | FULL TIME | 60 | 60 |
| | | | | | | | | | | | | | | ELECTRONICS & TELE-COMMUNICATION ENGINEERING | 1st Shift | FULL TIME | 60 | 60 |
| | | | | | | | | | | | | | | MECHANICAL ENGINEERING | 1st Shift | FULL TIME | 60 | 60 |
| 3 | 1-3508306408 | 3240 | 1-4205347 | ST. JOHN INSTITUTE OF PHARMACY AND RESEARCH | ST. JOHN TECHNICAL EDUCATION COMPLEX, VILLAGE- VEVOOR, PALGHAR, THANE DISTRICT, MAHARASHTRA PIN 401 404 | THANE | Unaided - Private | ALDEL EDUCATION TRUST | S/2, WEST VIEW AVENUE CO-OP, SOC. LTD., HOLY CROSS ROAD, I.C.COLONY, BORIVALI (WEST) | Y | PHARMACY | Maharashtra State Board of Technical Education, Mumbai | DIPLOMA | PHARMACY | 1st Shift | FULL TIME | 60 | 60 |
| 4 | 1-3508756922 | 5203 | 1-6249341 | K.B.H.S.S.TRUST'S INSTITUTE OF PHARMACY | OPP. JAJUWADI, BHAYGAON ROAD, KRISHI NAGAR MALEGAON CAMP MALEGAON | NASHIK | Unaided - Private | K.B.H.S.S.TRUST | SOMWAR BAZAR, RAVALGAON NAKA, MALEGAON CAMP, | N | PHARMACY | Maharashtra State Board of Technical Education, Mumbai | DIPLOMA | PHARMACY | 1st Shift | FULL TIME | 60 | 60 |
| 5 | 1-3508427300 | 5209 | 1-6783501 | COLLEGE OF PHARMACY | S. NO. 273-1/A, NH NO. 6, SAKEGAON, TAL. BHUSAWAL, DIST. JALGAON. PIN 425201 | JALGAON | Unaided - Private | KAI YASHODABAI DAGADU SARAF CHARITABLE TRUST | LAXMI NAGAR, YAWAL ROAD FAIZPUR | N | PHARMACY | Maharashtra State Board of Technical Education, Mumbai | DIPLOMA | PHARMACY | 1st Shift | FULL TIME | 60 | 60 |

## Annexure A

**List of Diploma Courses Converted From Second Shift to First Shift, Approved by AICTE for A.Y. 2018-19**

| Sr No | Current Application Number | Institute Code | Permanent ID | Institute Name | Institute Address | District | Institution Type | Parent Organisation | Organisation Address | Minority Institute | Program | University/ Board | Level | Course Name | Shift | Full Time/ Part Time | Intake Approved for 2017-18 | Intake Approved for 2018-19 |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 6 | 1-3508201620 | 6389 | 1-5612456 | RAJARAMBAPU COLLEGE OF PHARMACY, KASEGAON | A/P. KASEGAON, TAL: WALWA, DIST: SANGLI, MS, INDIA, 415404 | SANGLI | Unaided - Private | KASEGAON EDUCATION SOCIETY | C/O. RAJARAMBAPU INSTITUTE OF TECHNOLOGY, RAJARAMNAGAR, POST: SAKHARALE | N | PHARMACY | Maharashtra State Board of Technical Education, Mumbai | DIPLOMA | PHARMACY | 1st Shift | FULL TIME | 60 | 60 |
| 7 | 1-3508412325 | 6398 | 1-3960951 | SAHYADRI COLLEGE OF PHARMACY, METHWADE | AT / POST METHWADE, TALUQA- SANGOLA - 413307 DISTRICT SOLAPUR, MAHARASHTRA | SOLAPUR | Unaided - Private | SIKSHAN AND KRUSHI VIKAS PRATISHTHAN, MEDSHINGI. | A/P - METHWADE, TAL - SANGOLA, DIST - SOLAPUR. | N | PHARMACY | Maharashtra State Board of Technical Education, Mumbai | DIPLOMA | PHARMACY | 1st Shift | FULL TIME | 60 | 54 |